पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील १,१२७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टिआरए-०७१९/प्र.क्र.६३/पोल-८**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**

**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**

**दिनांक : ३० सप्टेंबर, २०१९**

संदर्भ : १) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : टिआरए-०२१९/प्र.क्र.२६/पोल-८, दि. ०८.०३.२०१९
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाचे पत्र क्रमांक पोआ/कक्ष-२(६)/रवका/१४/१८, दि.१५.०७.२०१९

**शासन निर्णय**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील १,१२७ अस्थायी पदांना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. आता सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील १,१२७ अस्थायी पदांना **दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२, २०२० पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून पुढे चालू ठेवण्यास शासन या आदेशाद्वारे मंजुरी देत आहे.

१. सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त असलेल्या अस्थायी पदांना (कार्यकारी पदे वगळून) ही मुदतवाढ लागू असणार नाही.
२. अस्थायी पदे ज्या कारणास्तव, ज्या अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्यांचे पालन करण्यात यावे.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर, २००१, क्रमांक असंक-१००४/प्र.क्र. १२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट, २००४, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ व क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १० फेब्रुवारी, २०१७ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाच्या सुधारीत आकृतीबंधास पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी उच्चस्तरीय समितीची अंतिमत: मान्यता प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही कोणत्याही परिस्थितीत विहीत मुदतीत प्राप्त करुन घेणे आवश्यक असल्याने त्याबाबतची आवश्यक ती कार्यवाही प्राथम्याने करण्यांत यावी. याबाबत वेळोवेळी दिलेल्या सूचना विचारात घेण्यांत याव्यात.
४. पदांच्या आढाव्याची कार्यवाही मुदतीत पूर्ण न झाल्यास, वरील अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्त्याचा प्रश्न निर्माण झाल्यास ती संबंधित कार्यालयाची जबाबदारी राहील.

२. यासाठी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्रमांक : बी-१, “२०५५ पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस (०२) शहर पोलीस (०२) (०१) आस्थापना” या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व हा खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तुतचे आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०९३०१६५६४६३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhaker Dhondu Pawar

Digitally signed by Sudhakar Dhondu Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=370693820257420609f4d474c2024d6ebdc571ea6ad2b769aa743bd3015cb5a3, serialNumber=ee05d69d6f5f431837c7addff9093dd5e97fd9ec63b0bc306c7f049f9d93d36c, cn=Sudhakar Dhondu Pawar
Date: 2019.09.30 16:59:43 +05'30'

**( सु. धों. पवार )**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
३. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), मुंबई
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
५. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा), नागपूर
६. कार्यासन (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
७. कार्यासन (आ.पु.क.) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
८. कार्यासन (पोल-३), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
९. निवडनस्ती पोल-८

**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील १,१२७ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ पासुन दिनांक २९.०२.२०२० पर्यंत पुढील मुदतवाढ देण्याबाबतचे पदांचे विवरणपत्र**

(शासन निर्णय, गृह विभाग, क्र. टिआरए-०७१९/प्र.क्र.६३/पोल-८, दिनांक ३०. ०९ .२०१९ चे सहपत्र)

**( मागील वेळी मुदतवाढ दिलेला गृह विभाग शासन निर्णय टिआरए-०९१८/प्र.क्र.१२०/पोल-८, दि. ०८.०३.२०१९ )**

| अ.क्र. | विषय | प्रस्तावित पदे | | पदे निर्माण केल्याचा गृह विभाग शासन निर्णय |
|---|---|---|---|---|
| | | पदनाम | पदसंख्या | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | वाहतूक नियंत्रण शाखेसाठी पोलीस अधिकारी / कर्मचारी दर्जाच्या संख्येत वाढ | पो.नि.<br>पो.उ.नि.<br>स.पो.उ.नि.<br>पो.ह.<br>पो.ह.ले.<br>पो.शि.<br>पो.शि.ले.<br>पो.शि.चा.<br>**एकूण** | ४<br>२५<br>१२<br>४८<br>१<br>१८०<br>१<br>१३<br>**२८४** | टिआरए-०१८६/२७५३/२/पोल-८, दि. २३.०९.१९८८<br><br>एपीओ-२६९२/प्र.क्र.४६७/पोल-३, दिनांक ५.०७.१९९२ अन्वये एक पद शासनास प्रत्यर्पित केले |
| २ | वाहतुक शाखेसाठी चालक पदे निर्माण करण्याबाबत | पो.शि.चालक<br>**एकूण** | २७<br>**२७** | टिआरए-१३९१/१९/पोल-८, दि. २९.०६.१९९२ |
| ३ | बेलोबॉय हे पद कायम स्वरुपी निर्माण करण्याबाबत | बेलोबॉय कम शिपाई<br>**एकूण** | १<br>**१** | टिआरए-१६९१/३/पोल-८, दि.११.११.१९९२ |
| ४ | बृहन्मुंबई पोलीस वाहतुक शाखेसाठी नवीन पदे निर्माण करणे | स.पो.उ.नि.<br>पो.ह.<br>पो.ना.<br>पो.शि.<br>**एकूण** | २५<br>१००<br>२१<br>५०<br>**१९६** | टिआरए १२९४/४९/पोल-८, दि. २२.०८.१९९५ |
| ५ | महिला अत्याचार प्रतिबंधक कक्षासाठी पदे निर्माण करणे | पो.शि.चा.<br>**एकूण** | १<br>**१** | पीपीए-१३९४/५/भाग-४/पोल-८, दि. २७.०९.२००२ |
| ६ | बृहन्मुंबई पोलीस वाहतुक शाखेसाठी नवीन पदे निर्माण करणे | पो.उप.आ.<br>पो.शि.<br>**एकूण** | २<br>७<br>**९** | टिआरए-०१०३/६६९/प्र.क्र.१०/ पोल-८, दि. ८.०९.२००३ पुरक पत्रक समक्रमांक दिनांक १९.०९.२००३ |
| ७ | न्यायाधिन कैद्यांची न्यायालयात तथा रुग्णालयात ने-आण करण्यासाठी पदे निर्माण करणे | पो.नि.<br>स.पो.नि.<br>पो.उ.नि.<br>स.पो.उ.नि.<br>पो.ह.<br>पो.शि.<br>**एकूण** | १<br>२<br>३५<br>३५<br>११०<br>४२६<br>६०९ | एमआयएस-०१०४/प्र.क्र.७७/२/ पोल-८, दि. १२.०७.२००४ |
| | | **एकुण पदे** | **१,१२७** | |